



# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान आपल्या वाचकांसाठी कृष्णसखा माझा या सुंदर पुस्तकाचे पाच भाग आणत आहे. सौ. प्रतिमा प्रविण आठवले यांच्या अथक परिश्रमांतून हे साकार होत आहे. त्यातला हा दुसरा भाग. हा तुम्हाला कसा वाटला ते सांगा. पाचवा भाग कृष्णाष्टमी ला प्रसिद्ध होईल. याच दरम्यान महाभारत (मूळ “जय” हा ग्रंथ) येत आहे.

२०१६ हे वर्ष ई साहित्यासाठी फ़ारच उत्साहाने सुरू झाले. या वर्षाची सुरुवातच मुळी लिओ टॉलस्टॉय, पॉल ब्रन्टन, आणि मनुस्मृतीने झाली. धर्माकडे पहाण्याचे तीन विविध दृष्टीकोन यांत आहेत. २०१५ मध्ये ई साहित्य मधून संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम, संत नामदेव, संत बहिणाबाई, संत कान्होपात्रा, संत चोखामेळा, गीतारहस्य, भगवद्गीता, अशा अनेक मौल्यवान ग्रंथांची ई निर्मिती करण्याचा योग आला. २०१६ ची सुरुवात बायबल, मनुस्मृती पासून झाली आणि त्यात कुराण, बौद्धमत, जैनधर्म, ज्यू, पारशी, वेद, उपनिषदे अशा विविध धर्मशास्त्रांची भर पडावी असा योग दिसतो आहे. योग दिसतो असे यासाठी म्हणतो की ही पुस्तके गेल्यावर्षीही आम्ही कुठे मुद्दाम शोधायला गेलो नव्हतो. श्री विजय पांढरे, डॉ. श्री अशोक धांडे, श्री अविनाश नगरकर, श्री अरुण फ़डके, श्री रत्नाकर महाजन, श्री फ़्रान्सिस आल्मेडा, श्री मधुकर सोनावणे, श्री अशोक कोठारे, श्री अरुण काकतकर या व इतर अनेक विद्वानांनी हे साहित्य मोठ्या विश्वासाने आमच्या हाती सोपवलं. आणि आम्ही फ़क्त पोस्टमनगिरी केली. आमच्या सुदैवाने प्रचंड मोठ्या वाचकवर्गाने या साहित्याचा आस्वाद घेतला. या महानुभावांच्या श्रमाचे काही प्रमाणात चीज झाले.

ई साहित्य प्रतिष्ठान निर्माण झाले नवीन साहित्यिकांसाठी एक व्यासपीठ म्हणून. ते तसेच आहे. आणि तसेच राहील. साधारण ८० टक्के पुस्तकं ही नवसाहित्यिकांचीच असतील. पण सुमारे वीस टक्के पुस्तकं नावाजलेली, वाचकप्रियही असावीत. म्हणजे वाचकांचा ओघ वाढता आणि वाहता रहातो.

मराठीतल्या महान प्रकाशकांच्या तुलनेत ई साहित्य अगदीच नगण्य आहे. आणि त्यांच्याशी तुलना वा स्पर्धा करण्याचा मानसही नाही. परंतू दर्जाच्या बाबतीत मात्र आम्ही तोडीस तोड राहू. हे वर्ष अत्यंत दर्जेदार कथा, कादंबऱ्या आणि काव्य-विनोद-शास्त्र पुस्तकांचे असेल याची आम्ही ग्वाही देतो.





आपण या साहित्य यज्ञात यथाशक्ती इंधन पुरवावे ही विनंती. आपल्या ओळखीच्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आमच्याकडे पाठवा. आम्ही तुम्हाला आमचे VIP सभासद करू. याशिवाय या कामात इतर अनेक तऱ्हांनी आपण सहभागी होऊ शकता. वेबसाईटला भेट तर देतच रहा. खंबीरपणे पाठीशी उभे रहा. मग बघाच काय काय चमत्कार घडतील ते.

आपले विश्वासू

टीम ई साहित्य